दिनांक ०३ ऑगस्ट,२०२४ हा दिवस "भारतीय अवयवदान दिन **(Indian Organ Donation Day)**" व जुलै, २०२४ हा महिना अवयवदान महिना (**Organ Donation Month**) म्हणून साजरा करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : जागृती-०७१६/प्र.क्र.३२/अधिनियम,**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १५ जुलै,२०२४.

**वाचा:-** सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र D.O.No.D-२२/६०४/IEC/NOTTO/२३, दि.२४.०६.२०२४

प्रस्तावना: -

एक अवयवदाता 8 ते 9 जीव वाचवू शकतो. तथापि, ज्या रूग्णांना अवयव प्रत्यारोपणाची गरज यांच्यात आणि उपलब्ध अवयवदाते यांच्या संख्येत खूप तफावत आहे. या संदर्भात, केंद्र शासनाने देशातील अवयवप्राप्ती व वितरणाची कार्यक्षम आणि संघटित प्रणाली विकसित करण्यासाठी आणि देणगीदारांची राष्ट्रीय नोंदणी ठेवण्यासाठी **National Organ and Tissue Transplant Organisation (NOTTO)** ही सर्वोच्च संस्था स्थापन केली आहे. तसेच त्याअंतर्गत प्रादेशिक आणि राज्य स्तरावर तत्सम संस्थांची स्थापना केली आहे. देशामध्ये अवयवदानाबद्दल जागरूकता पसरवण्यासाठी, अवयवदानाशी संबंधित समज व गैरसमज दूर व्हावे आणि मृत्यूनंतर अवयव व ऊतींचे दान करण्यासाठी नागरिकांत प्रेरणा व अवयवदानाचे मूल्य रूजावे, या उद्देशाने NOTTO दरवर्षी **"भारतीय अवयवदान दिन" (IODD)** साजरा करते. केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाने संदर्भाधीन पत्रान्वये कळविल्यानुसार, दि.०३.०८.२०२४ हा दिवस "भारतीय अवयवदान दिन" म्हणून आणि **जुलै, २०२४ (१ जुलै ते ३१ जुलै)** हा महिना **"अवयवदान महिना (Organ Donation Month)"** म्हणून साजरा करण्यासंदर्भातील कृती आराखडा/उपक्रम प्रसारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

केंद्र शासनाने अवयवदानास प्रोत्साहन देण्याकरिता चालू वर्षात **"अंगदान जन जागरूकता अभियान" (Angdaan Jan Jagrukta Abhiyaan)** या नावाने जनजागृती मोहीम राबविण्याचा निर्णय घेतला आहे. या मोहिमेचा एक भाग म्हणून मानवी अवयव प्रत्यारोपण अधिनियम, १९९४ दि.०८.०७.१९९४ रोजी लागू झाल्यानंतर देशात पहिली ह्रदय प्रत्यारोपणाची क्रिया झाली. अवयव प्रत्यारोपणाच्या पहिल्या मृत अवयवदात्याच्या स्मरणार्थ **दि.०३.०८.२०२४** हा दिवस **"भारतीय अवयवदान दिन"** म्हणून साजरा केला जाणार आहे. त्याअनुषंगाने विविध जनजागृतीपर उपक्रम राबविण्यासाठी **जुलै, २०२४ (१ जुलै ते ३१ जुलै)** हा महिना "**अवयवदान महिना (Organ Donation Month)**" म्हणून साजरा करण्याचे नियोजित आहे.

२. अवयवदान जनजागृती मोहिमेचे या वर्षाची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे आहेत-

अ) निरोगी जीवनशैली आणि सुदृढतेस प्रोत्साहन देऊन अवयव प्रत्यारोपणाची मागणी कमी करणे.

ब) मस्तिष्क स्तंभ मृत्यू, मृत अवयव दान याबाबत जनजागृती करणे, अवयव प्रत्यारोपणाशी संबंधित बेकायदेशीर प्रथांचे प्रतिबंध आणि नियंत्रण करणे.

क) अवयव दान आणि प्रत्यारोपणाशी संबंधित समज आणि गैरसमज दूर करणे.

ड) रुग्णालयांद्वारे मस्तिष्क स्तंभ मृत्यूच्या प्रकरणांचे Identification and Declaration यात वाढ करणे.

३. अवयवदान जनजागृती मोहिमेचे मोहिमेकरिता केंद्र शासनाने पुढीलप्रमाणे कृती आराखडा सुचविलेला आहे-

i. अवयव व उतीदानासाठी इच्छुकांनी NOTTO च्या www.notto.abdm.gov.in या संकेतस्थळावरील वेब पोर्टलच्या माध्यमातून ऑनलाइन प्रतिज्ञेद्वारे जास्तीत जास्त नोंदणी करावी. सदर नोंदणी परिशिष्ट-१ मध्ये संलग्न QR कोड स्कॅन करून वेब पोर्टलवर देखील करता येईल. तसेच, अवयवदान आणि ऑनलाइन प्रतिज्ञा संदर्भात अधिक माहितीसाठी, NOTTO च्या कॉल सेंटरशी टोल-फ्री हेल्पलाइन क्रमांक १८००-११-४७७० वर संपर्क साधावा.

ii. उपरोक्त वेब पोर्टलद्वारे अवयवदान प्रतिज्ञांच्या नोंदणीला प्रोत्साहन देण्यासाठी अवयवदान दौड, चित्रकला/स्लोगन/कविता, प्रश्नमंजुषा इत्यादी स्पर्धा, स्किट्स, नुक्कड नाटक/पथनाट्य, ऑडिओ व्हिज्युअल आणि सोशल मीडिया इत्यादी सारख्या विविध Information, Education and Communication (IEC) उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे. या मोहिमेत शालेय विद्यार्थी, महाविद्यालयीन विद्यार्थी आणि इतर तरुणांच्या सहभागास प्रोत्साहन देण्यात यावे.

iii. NOTTO वेब पोर्टलवर डिजिटल प्रतिज्ञाची नोंदणी, गाव आणि पंचायत स्तरावर कार्यरत असलेल्या सामायिक सेवा केंद्रांच्या (Common Service Centres) सहाय्याने आयोजित करावी. दि.०३.०८.२०२४ या भारतीय अवयवदान दिनी सोबत जोडलेल्या परिशिष्ट-२ मधील अंगदान प्रतिज्ञेचे सामुहिक वाचनाचे आयोजन करावे. सदर प्रतिज्ञा संबंधित सरपंचाद्वारे देण्यात यावी. अशाच प्रकारचे आयोजन जिल्हा मुख्यालय, उपविभाग आणि गट स्तरावर करण्यात जावे. (इंग्रजी, हिंदी व मराठीमधील प्रतिज्ञा सोबत परिशिष्ट-२ मध्ये जोडली आहे.

iv. संबंधित जिल्ह्यांतील जिल्हाधिकारी/जिल्हा दंडाधिकारी यांच्या कार्यालयाने त्यांच्या जिल्ह्यांतील अभियानावर देखरेख ठेवून सहभाग नोंदवावा.

v. **"अंगदान जन जागरुकता अभियाना"** दरम्यान आणि **दि.०३.०८.२०२४** या **"भारतीय अवयवदान दिनी"** वरील प्रकारचे सर्व उपक्रम केंद्र शासनाची सर्व मंत्रालये, रुग्णालये/संस्था आणि वैद्यकीय महाविद्यालये (सरकारी आणि खाजगी) यांनी राबवावेत.

vi. **“अवयवदान महिना (Organ Donation Month)”** व “**भारतीय अवयवदान दिना**निमित्त” राबविलेले उपक्रमांची छायाचित्रे, अहवाल संचालक, NOTTO, ४था मजला, ICMR इमारत, सफदरजंग रूग्णालय आवार, नवी दिल्ली-११० ०२९ (organdonationnotto@gmail.com या ई-मेलवर व ०११-२६१६४७७० या फोन नंबर) वर पाठवावे.

४. केंद्र शासनाने प्रसारित केलेल्या वरील कृती आराखड्याची अंमलबजावणी जास्तीत जास्त होण्याकरिता सर्व मंत्रालयीन विभागांनी प्रस्तुत कृती आराखडा त्यांच्या अखत्यारितील यंत्रणांच्या निदर्शनास आणून उपक्रमात जास्तीत जास्त सहभाग नोंदवावा. शाळा, महाविद्यालये, शासकीय/निमशासकीय कार्यालये/संस्था, शासकीय रूग्णालये, ग्रामपंचायत, पंचायत समिती, जिल्हा परिषद, विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी कार्यालये ई. पातळीवर उपरोक्तपणे सुचविलेल्या विविध उपक्रमांची अंमलबजावणी करावी.

५. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अखत्यारितील सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नित रूग्णालये, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांनी केंद्र शासनाने प्रसारित केलेल्या वरील उपक्रमाची अंमलबजावणी करावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात येत असून त्यांचा संकेतांक २०२४०७१५१८३१३३३९१३ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2024.07.15 19:31:47 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, वाळकेश्वर मार्ग, मलबार हिल, मुंबई-४०००३५,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२,
३) सर्व पालकमंत्री,
४) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई ४०००३२,
६) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई ४०००३२,
७) सर्व खासदार, सर्व आमदार, सर्व महापौर, सर्व जिल्हापरिषद अध्यक्ष,
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
९) मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,

१०) महासंचालक, माहीती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००३२,
११) सर्व विभागीय आयुक्त, महसूल,
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, संश्शोधन व आयुष, मुंबई-४०० ००१,
१४) सर्व आयुक्त महानगरपालिका,
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद,
१६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
१७) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१८) संचालक, आरोग्य संचालनालय, मुंबई.
१९) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक,
२०) अध्यक्ष, विभागीय अवयव प्रत्यारोपण समिती (ZTCC) मुंबई,
२१) विभागीय अवयवदान प्राधिकरण समिती प्रमुख, मुंबई,
२२) राज्य अध्यक्ष, अवयवदान प्रत्यारोपण प्राधिकरण,
२३) सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा,
२४) सर्व अधिष्ठाता, शासकीय /खाजगी वैद्यकीय महाविद्यालये,
२५) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी,
२६) सर्व जिल्हा शिक्षण अधिकारी,
२७) सर्व मुख्याधिकारी नगरपालिका,
२८) निवडनस्ती, अधिनियम.

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन परिपत्रक क्र. जागृती -०७१६/प्र.क्र.३२/अधिनियम,
दि. १५ जुलै,२०२४ चे सहपत्र.

परिशिष्ट-२

**ORGAN DONATION PLEDGE**

**I,.........pledge to donate such of my organs and tissues as could be used after my death to give new lease of life to those in need.**

**Keeping in view the shortage of organs and tissues for transplantation in our country, I also pledge that I will make all efforts to inspire my family, friends and fellow citizens to donate organs and tissues after death.**

अंगदान प्रतिज्ञा

मैं.......... प्रतिज्ञा करता /करती हूँ कि मैं अपने ऐसे अंगों और उत्तकों को, जिनका उपयोग मेरी मृत्यु के पश्चात किसी को नया जीवन देने के लिए किया जा सकता है, दान करूँगा/ करूँगी।

हमारे देश में प्रत्यारोपण के लिए अंगों और उत्तकों की कमी को देखते हुए, मैं यह भी प्रतिज्ञा करता/ करती हूँ कि मैं अपने परिवार, मित्रों और देशवासियों को भी अपने अंग एवं उत्तक दान करने प्रेरित करने के सभी प्रयास करूँगा/करूँगी।

अवयवदान प्रतिज्ञा

मी, ........... प्रतिज्ञा करतो/करते की, मी माझे असे अवयव आणि ऊती दान करीन ज्याचा उपयोग माझ्या मृत्यूनंतर एखाद्याला नवीन जीवन देण्यासाठी करता येईल.

आपल्या देशात प्रत्यारोपणासाठी अवयव आणि ऊतींचा तुटवडा लक्षात घेता, मी अशीही प्रतिज्ञा करतो/करते की, माझे कुटुंब, मित्र आणि देशवासीयांना अवयव आणि ऊती दान करण्यासाठी प्रोत्साहित करण्याचे मी सर्वतोपरी प्रयत्न करेन.

********************

**Annexure 1**

# Scan to pledge




or visit

# notto.abdm.gov.in